**राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पांतर्गत कंपोनंट डी करिता केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला निधी राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पाच्या बँक खात्यात जमा करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग (आपत्ती व्यवस्थापन प्रभाग)**

**शासन निर्णय क्र.आव्यप्र- २०१८/प्र.क्र.१०३/आव्यप्र-१**

मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२.

दि.१९ जूलै, २०१८

वाचा :

१. गृह मंत्रालय,भारत सरकार यांचे आदेश क्रमांक ४७-०१/२०१२-DM III/६०६, दि. २३.०२.२०१८.

२. गृह मंत्रालय,भारत सरकार यांचे आदेश क्रमांक ४७-०१/२०१२-DM III/९३८-९४४, दि. २२.०३.२०१८.

**शासन निर्णय** :

राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पांतर्गत कंपोनंट डी करीता केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला रु. ६० लाख (रुपये साठ लाख फक्त) एवढा निधी आहरित करुन राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पासाठी उघडण्यात आलेल्या स्वंतत्र बँक खात्यात जमा करण्यास खालील अटींवर शासन मान्यता देण्यात येत आहे.

- राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्पाकरिता ॲक्सिस बँकेत उघडण्यात आलेल्या बचत खात्यातील शिल्लक रकमेवर मिळणाऱ्या व्याजाचा वापर सदर योजनेच्या अंमलबजावणी करीताच करण्यात यावा अथवा पुढील निधी वितरणाचे वेळी सदर व्याजाची रक्कम समायोजित करावी.
- केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला निधी त्या-त्या वित्तीय वर्षात खर्च करणे बंधनकारक राहील व त्यापुढे शासनाच्या मंजूरीने मुदतवाढीप्रमाणे खर्च करता येईल. ज्या प्रकरणी मुदतवाढ दिलेली नाही अशा प्रकरणी सदर बँक खात्यातील व्यवहाराचे मासिक / तिमाही ताळमेळ करणे तसेच लेखा परीक्षण करणे आवश्यक राहील.
- सदर बँक खात्यातील व्यवहाराचे मासिक/तिमाही ताळमेळ करणे तसेच लेखा परीक्षण करणे आवश्यक राहील.
- प्रकल्प बंद झाल्यानंतर त्याकरीता उघडण्यात आलेले बँक खाते, त्यामधील शिल्लक रक्कम यांचा ताळमेळ घेऊन शिल्लक असलेली अखर्चित रक्कम योग्य त्या शासन लेखाशिर्षाखाली तात्काळ जमा करावी.

वरील निधी आहरित करण्यासाठी श्रीमती वनिता बाविस्कर, लेखाधिकारी आणि श्री. अरुण कोल्हे, वित्तीय सल्लागार व सहसचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग यांना अनुक्रमे आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

या कामी होणारा खर्च मागणी क्र. सी-६ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य (०८) प्रकल्प व्यवस्थापन आणि प्रकल्प अंमलबजावणी गटासाठी सहाय्य (०८) (०१) प्रकल्प व्यवस्थापन आणि प्रकल्प अंमलबजावणी गटासाठी सहाय्य (२२४५ २६२१) ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन) या लेखाशीर्षाअंतर्गत आर्थिक वर्ष २०१८-१९ करीता करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर आदेश नियोजन विभाग आणि वित्त विभागाच्या सहमतीने नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ८४/१४७५ दि. ०९.०५.२०१८ आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक २६५/१८/को प्र-५ दि.२३.०५.२०१८ आणि अनौपचारीक संदर्भ क्रमांक २८८/अर्थ६/१८ दिनांक २५/०६/२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१८०७२०१२४६४८९८१९ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrirang Shripati Gholap

Digitally signed by Shrirang Shripati Gholap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DMU/R AND R, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e1b6e289fe7dcde27c972916398d8220a134ed8ebf6439e54d1927c5c4b28bec, cn=Shrirang Shripati Gholap
Date: 2018.07.20 12:46:50 +05'30'

**(श्रीरंग घोलप)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
४) महालेखापाल (लेखापरीक्षा), मुंबई.
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई
८) निवड नस्ती, आव्यप्र-१